आस्थापना - अमरावती विभाग
**एकूण १३७५ अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२३ ते दि.३१/०८/२०२३ या कालावधीपर्यंत मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : इएसटी -२०२२/प्र.क्र.५२/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १३ मार्च, २०२३

संदर्भ :-

१. महसूल व वन विभाग,शासन निर्णय, क्रमांक : संकिर्ण-१००२/प्र.क्र. ६६(भाग-२)/ई-८, दिनांक २०/०३/२००६.
२. महसूल व वन विभाग,शासन निर्णय, क्रमांक : प्राफेब-२०१०/प्र.क्र.-२६/पुनर्बांधणी-३/ म-१०, दिनांक ३०/०७/२०१३.
३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय, क्रमांक : ईएसटी-२०१७/प्र.क्र.३७/ई-८, दि.१३/०४/२०१७.
४. महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्रमांकः ईएसटी-२०१९/प्र.क्र.३७/ई-८, दि.०८/०४/२०१९ व दि.१७/१०/२०१९
५. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.१८/०८/२०२२
६. महसूल व वन विभाग, शासन निर्णय,क्रमांक : ईएसटी-२०२२/प्र.क्र.५२/ई-८,दि.०३/१०/२०२२
७. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०८/०२/२०२३
८. विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र आकाआ/म.शा.३/प्र.क्र.११/कावि-१६/२०२३, दि.१८/०१/२०२३.

प्रस्तावना:-

वित्त विभागाच्या दिनांक १८/०८/२०२२ च्या शासन निर्णयास अनुसरुन विभागीय आयुक्त, अमरावती तसेच जिल्हाधिकारी, अमरावती/ वाशिम/ यवतमाळ/ बुलडाणा व अकोला यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील १३६८ अस्थायी पदांना व यवतमाळ जिल्हयातील नवनिर्मित अपर तहसिल कार्यालय, मेटीखेडा ता. कळंब जि. यवतमाळ या कार्यालयाकरीता ७ अस्थायी अशा एकूण १३७५ पदांना पदांना दि.०१/०९/२०२२ ते दि.२८/०२/२०२३ या कालावधीसाठी महसूल व वन विभागाच्या संदर्भाधिन दि.०३/१०/२०२२ च्या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.०८/०२/२०२३ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतीबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतीबंधात करण्यात आलेला नाही अशा अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२३ ते दि.३१/०८/२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत. त्यास विभागीय आयुक्त, अमरावती तसेच जिल्हाधिकारी, अमरावती/ वाशिम/ यवतमाळ/ बुलडाणा व अकोला यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील १३६८ अस्थायी पदांना व यवतमाळ जिल्हयातील नवनिर्मित अपर तहसिल कार्यालय, मेटीखेडा ता. कळंब जि. यवतमाळ या कार्यालयाकरीता ७ अस्थायी अशा एकूण १३७५ अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२३ ते दि.३१/०८/२०२३ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विभागीय आयुक्त, अमरावती तसेच जिल्हाधिकारी,अमरावती/वाशिम/यवतमाळ/बुलडाणा व अकोला यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या अधिपत्याखालील उप विभागीय अधिकारी, तहसिलदार व मंडळ अधिकारी या क्षेत्रिय कार्यालयातील आकृतीबंधातील १३६८ अस्थायी पदांना व यवतमाळ जिल्हयातील नवनिर्मित अपर तहसिल कार्यालय, मेटीखेडा ता. कळंब जि. यवतमाळ या कार्यालयाकरीता ७ अस्थायी अशा एकूण १३७५ पदांना **दि.०१/०३/२०२३ ते दि.३१/०८/२०२३** या कालावधीसाठी वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०८/०२/२०२३ च्या शासन निर्णयातील अटींच्या अधीन राहून मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. सदर अस्थायी पदांवर होणारा खर्च संदर्भाधीन क्र. ०३ येथील शासन निर्णयासोबतच्या संबंधित विवरणपत्रातील रकाना - क्र. ०५ मध्ये दर्शविलेल्या लेखाशिर्षाखालील सन २०२३-२०२४ साठी मंजूर झालेल्या अर्थसंकल्पिय अनुदानातुन भागविण्यात यावा.

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०८/०२/२०२३ च्या शासन निर्णयात दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेणे आवश्यक असल्याचे तसेच यानंतर सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याकरिता कालावधी वाढवून देण्यात येणार नाही, याची सर्व विभागांनी नोंद घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे.

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दि.०८/०२/२०२३ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०३१४१५१३४३६०१९ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr.SHWETA SAWDEKAR BAIG

Digitally signed by Dr.SHWETA SAWDEKAR BAIG
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6281ac1913ceb1456ffcfd8e5d3dbe032cfa746426763d6351cb898b72986801, pseudonym=7EEE8BAF53B2BFC59945DABFC99C96C2C2709F7F, serialNumber=2FA86D3D30D0DE896CC35E8F420B067861B1ECA1D14FF010A5202C61E6ADC6FE, cn=Dr.SHWETA SAWDEKAR BAIG
Date: 2023.03.14 15:18:04 +05'30'

**( डॉ. श्वेता सावदेकर-बेग )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
२) जिल्हाधिकारी, अमरावती/ वाशिम/ यवतमाळ /बुलढाणा व अकोला.
३) अपर जिल्हाधिकारी/उप विभागीय अधिकारी/ तहसिलदार / मंडळ अधिकारी (संबंधित जिल्हाधिकारी यांच्यामार्फत).
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर.
५) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/ वाशिम/ यवतमाळ /बुलढाणा व अकोला.
६) उप सचिव, कार्यासन (आ.पु.क./व्यय-९), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७) सह सचिव, कार्यासन ब-१, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) निवड नस्ती, ( कार्यासन ई-८), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.